महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांना विशेषज्ञ संवर्गातील वैद्यकीय अधिकारी (कान,नाक, घसा) या पदावर पदोन्नती देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः पदोन्न-१११२/प्र.क्र.५४१/सेवा-२
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,दहावा मजला
मंत्रालय,मुंबई
तारीख: २३ जुलै,२०१४

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे. ५४००/- ) मधील खालील तक्त्यात उल्लेखीत ४ वैद्यकीय अधिका-यांना विशेषज्ञ संवर्गातील (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे. ६६००/- ) वैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा) या पदावर सदर आदेशाच्या दिनांकापासून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदर पदोन्नती आदेशान्वये संबंधित वैद्यकीय अधिका-यांची पदस्थापना स्तंभ क्रमांक ४ येथे दर्शविलेल्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिका-याचे नाव व सध्याची पदस्थापना | निवडीचा प्रवर्ग | या आदेशान्वये देण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | डॉ.अशोक गोविंद कांबळे, वैद्यकीय अधिकारी , सामान्य रुग्णालय, पुणे | अ.जा | वैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा), सामान्य रुग्णालय,ठाणे (रिक्तपदी) |
| २ | डॉ.सुरेश बळीराम थोरात,वैद्यकीय अधिकारी,सामान्य रुग्णालय, अमरावती | अ.जा. | वैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा), सामान्य रुग्णालय,बुलढाणा (रिक्तपदी) |
| ३ | डॉ.दत्तात्रय जगन्नाथ त्रिवेदी, प्राध्यापक, आरोग्य प्रशिक्षण संस्था, नागपूर | खुला | वैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा), सामान्य रुग्णालय, भंडारा (रिक्तपदी) |
| ४ | डॉ.किशोर बाबुराव देशमुख, वैद्यकीय अधिकारी, सामान्य रुग्णालय, अमरावती. | खुला | वैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा), सामान्य रुग्णालय, हिंगोली (रिक्तपदी) |

२. सदर पदोन्नती महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधीलवैद्यकीय अधिकारी (कान,नाक,घसा) या पदांच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदींनुसार देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित याचिका क्र.८४५२/२००४ वरील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

४. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम,१९८१मधील नियम क्रमांक ११(१) (ए)नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल संचालक,आरोग्य सेवा, मुंबई व संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा यांना व शासनास सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम,१९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरेल.

६. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत हजर व्हावे अन्यथा ते पदोन्नतीस इच्छूक नाहीत हे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. या प्रकरणी संबंधित उपसंचालक यांनी संबंधित अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१४०७२२१४१९४९८७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JADHAV RAMCHANDRA S

Digitally signed by JADHAV RAMCHANDRA S
DN: CN = JADHAV RAMCHANDRA S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.07.23 16:16:54 +05'30'

( रा.शं.जाधव )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)

२) संचालक, आरोग्य सेवा,आरोग्य भवन,मुंबई

३) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
४) उपसंचालक,आरोग्य सेवा,मुंबईमंडळ,ठाणे/ पुणेमंडळ ,पुणे/अकोलामंडळ,अकोला/ नागपूरमंडळ,नागपूर/औरंगाबाद,मंडळऔरंगाबाद
५) जिल्हा शल्य चिकित्सक,सामान्य रुग्णालय,पुणे/ठाणे/अमरावती/बुलढाणा/भंडारा/हिंगोली
६) प्राचार्य,आरोग्यप्रशिक्षण संस्था, नागपूर
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१ , मुंबई / महाराष्ट्र -२ , नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१ , मुंबई / महाराष्ट्र -२ , नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ ठाणे/अमरावती/बुलढाणा/भंडारा/हिंगोली/नागपूर
१०) कक्ष अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग(कार्यासन-१२),मंत्रालय,मुंबई
११) डॉ.अशोक गोविंद कांबळे,(कान,नाक,घसा तज्ञ),सामान्य रुग्णालय,पुणे
१२) डॉ.सुरेश बळीराम थोरात,वैद्यकीय अधिकारी,सामान्य रुग्णालय,अमरावती
१३) डॉ. दत्तात्रय जगन्नाथ त्रिवेदी, प्राध्यापक,आरोग्य प्रशिक्षण संस्था,नागपूर
१४) डॉ. किशोर बाबुराव देशमुख,वैद्यकीय अधिकारी,सामान्य रुग्णालय,अमरावती
१५) मा.प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक
१६) मा.सचिव(२),सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक
१७) निवड नस्ती ( सेवा-२)